आकाशवाणी नागपूर,

प्रादेशिक वृत्त विभाग

प्रादेशिक बातम्या (मराठी - वेळ सायंकाळी ६.४०)

शनिवार, दिनांक ०१ ऑगस्ट २०२०

आकाशवाणी नागपूर

काही ठळक बातम्या...

1. स्मार्ट इंडिया हक्केथॉनला पंतप्रधान नरेंद्र मोदी यांनी आज संबोधित केलं.
2. लोकमान्य टिळक स्मृती शताब्दी आणि लोकशाहिर अन्नाभाऊ साठे जन्मशताब्दी निमित्त आदरांजली.
3. दूधला वाढीव भाव मिळण्याकरिता राज्यभरात आंदोलन.

आणि

4. कवी कुलगुरू कालिदास विश्व विद्यापीठातर्फे संस्कृत महोत्सव-२०२० चं ३ ऑगस्ट रोजी महाराष्ट्र स्तरावर आयोजन.

*********

अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या, स्मार्ट इंडिया हक्केथॉनला पंतप्रधान नरेंद्र मोदी यांनी आज सायंकाळी संबोधित केलं. यावेळी विद्यार्थ्यांशी संवाद साधतांना, स्मार्ट इंडिया हक्काथॉनच्या माध्यमातून देशात गेल्या काही वर्षांत आश्चर्यकारक नवकल्पनाही आल्या आहेत. देशाला आत्मनिर्भर बनविण्यासाठी युवा नवीन उपायांवर काम करत राहतील, अशी अपेआक्षा त्यांनी बोलतांना व्यक्त केली. केंद्रीय मनुष्यबळ विकास मंत्रालयानं आयोजित केलेल्या, हक्केथॉनची ही चौथी आवृत्ती आहे आणि तरुणांच्या मनातील विचारांना प्रोत्साहन देण्यासाठी ही अत्यंत यशस्वी ठरली आहे. स्मार्ट इंडिया हक्केथॉन, हा विद्यार्थ्यांना आपल्या दैनंदिन जीवनात ज्या काही समस्या उद्‌भवतात त्या सोडवण्यासाठी, एक व्यासपीठ उपलब्ध करून देण्यासाठी देशव्यापी उपक्रम आहे. ग्रँड फिनालेचं आयोजन, देशभरातील सर्वसहभागींना एका खास अंगभूत प्रगत व्यासपीठावर, ऑनलाइन पद्धतीनं एकत्र जोडून केलं जाईल. केंद्र सरकारचे ३७ विभाग, राज्य सरकारचे १७ आणि २० उद्योगांमधील २४३ समस्याची निवेदनं सोडविण्यासाठी, दहा हजाराहून अधिक विद्यार्थी या स्पर्धेत सहभाग घेतील. नागपूरात देखील स्मार्ट इंडिया हक्काथॉनच्या सॉफ्टवेयर आवृत्तीचं उद्‌घाटन, जी.एच. रायसोनी अभियांत्रिकी महाविद्यालयात झालं. या महाविद्यालयाची सदर स्पर्धेसाठी एक नोडल केंद्र म्हणून निवड झाली आहे. अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद आणि केंद्रीय मनुष्यबळ विकास अंतर्गत, नवोन्मेष सेल कडुन तीन समस्यांसाठी १०६ स्पर्धक असलेले, एकूण सोळा संघ सदर स्पर्धेत सहभागी झाले आहेत. प्रत्येक समस्येच्या निराकरणासाठी एक लाख रुपयांचं बक्षिस राहणार आहे. सदर सॉफ्टवेअर स्पर्धा तीन ऑगस्टपर्यंत सुरू राहणार असून त्यानंतर पाच ऑगस्ट रोजी नोडल सेंटर जी.एच. रायसोनी अभियांत्रिकी महाविद्यालय नागपूर इथं पारितोषिक वितरण आणि समारोपीय सोहळा होणार आहे.

*********

ईद-उल-अझा निमित्त पंतप्रधान नरेंद्र मोदी बांग्लादेशच्या पंतप्रधान शेख हसीना यांना शुभेच्छा दिल्या आहेत. हा सण आपल्याला भारत आणि बांगलादेशातील ऐतिहासिक आणि सांस्कृतिक दुव्यांची आठवण करून देतो, असं मोदींनी बांगलादेशात जनतेला शुभेच्छा देताना म्हटलं. ईद-उल-अझा अर्थात बकरी ईदचा सण आज देशभर भक्तिभावाने साजरा होत आहे. मात्र कोरोनाच सावट असल्यामुळे बहुतांश ठिकाणी मुस्लिम धर्मीयांना सुरक्षित अंतराचे नियम पाळून घराजवळच्या मशिदीमध्ये नमाज पठण केलं. ज्या राज्यांमध्ये अजूनही टाळेबंदी लागू आहे अशा ठिकाणी लोकांनी आपापल्या घरांमध्येच नमाज अदा केली आहे. दरम्यान, बुलडाणा जिल्ह्याच्या खामगाव तालुक्यातील सर्वात मोठे गाव असणाऱ्या लाखनवाडा येथे

सामाजिक अंतर ठेवत मुस्लिम समुदायीकांनी घरीच नमाज अदा करुन सामाजिक अंतर राखत एकमेकांना ईदच्या शुभेच्छा दिल्या. सर्व नियमांचे पालन करत सामाजिक भान ठेवुन ईद सण साजरा केल्याने बुलडाणा जिल्ह्यातील लाखनवाडा ह्या गावाने एक आदर्श निर्माण केला. या गावामध्ये ईदनिमित्त स्त्रीरोगतज्ञ डॉ. फरीदा खान यांनी महीला रुग्णांची मोफत तपासणी केली असल्याची माहिती आमच्या प्रतिनिधीने दिली आहे.

*********

लोकमान्य टिळक यांच्या स्मृती शताब्दीनिमित्त, पंतप्रधान नरेंद्र मोदी यांनी त्यांना आज आदरांजली अर्पण केली. लोकमान्यांची विद्वत्ता, धैर्य, न्यायाविषयीची जाणीव आणि स्वराज्याची संकल्पना, प्रत्येकाला कायम प्रेरणा देत राहील असं, पंतप्रधानांनी यानिमित्त केलेल्या ट्विटमध्ये म्हटलं आहे. केंद्रीय माहिती आणि प्रसारण मंत्री प्रकाश जावडेकर यांनीही, लोकमान्यांच्या स्मृतींला अभिवादन केलं. लोकमान्य टिळकांची स्वराज्याविषयीची संकल्पना, प्रत्येक भारतीयाला आदर्शवत आहे असं, जावडेकर यांनी म्हटलं आहे. लोकमान्य बाळ गंगाधर टिळक स्मृतीशताब्दी आणि लोकशाहीर अण्णाभाऊ साठे जन्मशताब्दी, हे एकत्र असण एक योगायोग आहे. या दोन्ही महापुरुषांकडून काय घ्यावं, हे अधिक महत्वाचं आहे. हे दोन्ही महापुरुष शब्दप्रभू होते असं मत, मुख्यमंत्री उद्धव ठाकरे यांनी व्यक्त केलं आहे. उच्च आणि तंत्र शिक्षण विभाग महाराष्ट्र शासन, मुंबई विद्यापीठ आणि सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ यांच्या संयुक्त विद्यमानं लोकमान्य बाळ गंगाधर टिळक स्मृती शताब्दी आणि लोकशाहीर अण्णाभाऊ साठे जन्म शताब्दी समारोह कार्यक्रम ऑनलाईन आयोजित करण्यात आला होता. या कार्यक्रमाचं उद्घाटन मुख्यमंत्र्यांच्या हस्ते करण्यात आलं, त्यावेळी ते बोलत होते.

*********

महत्वाकांक्षी, एक राष्ट्र एक रेशन कार्ड योजना आजपासून, आणखी चार राज्यांत वाढविण्यात आली आहे. मणिपूर, नागालँड, जम्मू-काश्मीर आणि उत्तराखंड या राज्यांमध्ये ही योजना वाढविण्यात आली आहे. यासह आता चोवीस राज्यांमध्ये राष्ट्रीय अन्न सुरक्षा कायद्याच्या ६५ कोटीहून अधिक लाभार्थ्यांना रेशनकार्ड पोर्टेबिलिटीची सुविधा उपलब्ध होणार आहे. केंद्रीय अन्नमंत्री रामविलास पासवान म्हणाले की, आता लाभार्थी या राज्यांतील कोणत्याही रास्त भाव दुकानातून रेशन उचलू शकतील. पुढील वर्षी ३१ मार्चपर्यंत सर्व राज्यांना, एक राष्ट्र एक रेशनकार्ड अंतर्गत आणण्यात येणार असून, या योजनेअंतर्गत, ८१ कोटी लाभार्थी थेट लाभ घेऊ शकणार आहेत.

*********

सिंगापूर येथील रुग्णालयात भरती असलेल्या समाजवादी पक्षाचे नेते अमरसिंह यांचे आज निधन झाले. गेल्या काही महिन्यांपासून ते आजारी होते. यापूर्वी त्यांनी किडनी प्रत्यारोपणाची शस्त्रक्रिया केली होती.

*********

दुधाला प्रति लिटर तीस रुपये दरभाव द्यावा, दूध उत्पादकांना प्रति लिटरमागे दहा रुपये अनुदान द्यावं, तसंच दूधाच्या भुकटीसाठी पन्नास रुपयांचं अनुदान द्यावं या मागण्यांसाठी, आज राज्यभरात भाजपाच्या नेतृत्वात, विरोधी पक्ष आणि विविध संघटनांच्या वतीनं आंदोलन करण्यात आलं. अहमदनगर जिल्ह्यातली विविध संघटनांनी आंदोलनात सहभाग घेतला. अकोले तालुक्यात दूध उत्पादक संघर्ष समितीच्या वतीनं दगडाला तर, पुणतांबा इथं, किसान क्रांती मोर्चाच्या वतीनं, बळीराजाच्या पुतळ्याला दुधाचा अभिषेक करण्यात आला. अनेक ठिकाणी, शेतकऱ्यांनी जनावरांना चावडीवर बांधून, दूध ओतून देत सरकारचा निषेध केला. आमदार राधाकृष्ण विखे पाटील हे सुद्धा आंदोलनात सहभागी झाले होते. बुलडाणा जिल्ह्यात चिखली, खामगाव, तसंच जळगाव-जामोद शहरात गोरगरीब वस्त्यांमध्ये, दुधाचे घरोघरी वाटप करून आणि सरकारविरोधी घोषणा देत आंदोलन करण्यात आलं. गडचिरोलीत चार्मोशी इथं आमदार, डॉक्टर

देवराव होळी यांच्या नेतृत्वाखाली, तर जिल्ह्यात इतरत्रही भाजपाच्या कार्यकर्त्यांनी आंदोलन करून सरकारचा निषेध केला. भाजप महायुतीच्या वतीनं अमरावती जिल्ह्यात महाएल्गार आंदोलन करण्यात आलं. भाजपा ग्रामीण अध्यक्षा निवेदिता चौधरी, प्रदेश किसान आघाडीचे अध्यक्ष, डॉक्टर अनिल बोंडे यांच्या नेतृत्वात राष्ट्रीय महामार्गावरील नांदगाव पेठ नाक्यावर, दूध पुरवठा करणारी वाहनं अडवून, महाविकासआघाडी शासनाच्या विरोधात घोषणा देऊन, आंदोलनाची सुरुवात करण्यात आली.

*********

देशभरात काल एका दिवसात ३६ हजार ५६९ एवढे कोरोनाबाधित बरे होऊन घरी परतले. बरे झालेल्यांची आतापर्यंतची एकूण संख्या १० लाख ९४ हजार ३७४ झाली आहे. देशातलं कोरोना रुग्ण बरे होण्याचं प्रमाण ६४ पूर्णांक ५२ शतांश टक्के, इतकं आहे. देशभरात काल ५७ हजार ११८, एवढ्या एका दिवसातल्या सर्वाधिक संख्येनं, नव्या कोरोना बाधितांची भर पडली, त्यामुळं देशातल्या कोरोनाबाधितांची एकूण संख्या आता, १६ लाख ९५ हजार ९८८ इतकी झाली आहे. त्यापैकी, ५ लाख ६५ हजार १०३ कोरोनाबाधितांवर, सध्या देशभरात उपचार सुरू आहेत. देशभरात काल ७६४ कोरोना मृत्यूंची नोंद झाली असून, कोरोना मृतांची एकूण संख्या, ३६ हजार ५११ झाली आहे. मात्र, देशातला मृत्यूदर सातत्यानं कमी होत असून सध्या तो, २ पूर्णांक १५ शतांश टक्के इतका खाली आल्याची माहिती, केंद्रीय आरोग्य विभागानं आज दिली.

*********

राज्यात काल ७ हजार ५४३ रुग्ण बरे होऊन घरी परतले. त्यामुळे आतापर्यंत बरे झालेल्या रुग्णांची एकूण संख्या २ लाख ५६ हजार १५८ झाली आहे. राज्यात रुग्ण बरे होण्याचं प्रमाण ६० पूर्णांक ६८ शतांश टक्के आहे. राज्यात काल १० हजार ३२० नव्या कोरोना बाधित रुग्णांची नोंद झाली असून, राज्यातल्या कोरोना बाधितांची एकूण संख्या ४ लाख २२ हजार ११८ झाली आहे. यापैकी १ लाख ५० हजार ६६२ रुग्णांवर सध्या उपचार सुरू आहेत अशी माहिती, आरोग्यमंत्री राजेश टोपे यांनी काल दिली. राज्यात काल २६५ कोरोनाबाधित रुग्णांच्या मृत्यूंची नोंद झाली. राज्यातला मृत्यूदर आता ३ पूर्णांक ५५ शतांश टक्के एवढा आहे. दरम्यान, चंद्रपूर जिल्ह्यातील बाधितांची संख्या दररोज वाढत असून, काल उशिरा जिल्हाधिकारी कार्यालयातील तीन कर्मचारी देखील पॉझिटिव्ह ठरले आहेत. जिल्ह्यात आतापर्यंत ५२३ लोकांना कोरोना आजाराची लागण झाली असून, यातले ३२२ बाधित बरे झाले आहेत. जिल्ह्यात आता रुग्णांची संख्या ५२३ येवढी झाली आहेत. दरम्यान आज दुपारीदीड वाजताच्या सुमारास चंद्रपूर वैद्यकीय महाविद्यालय रुग्णालयात कोरोना आजारामुळे 42 वर्षीय बाधिताचा मृत्यू झाला. चंद्रपूर जिल्ह्यातील हा कोरोनामुळे झालेला पहिला मृत्यू आहे. संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठाच्या प्रयोगशाळेने अमरावती जिल्हा शल्यचिकित्सक यांना आज उपलब्ध करून दिलेल्या अहवालात २६ पॉझिटिव्ह रुग्ण आढळले आहेत. आतापर्यंत ४० रुग्ण आढळले असून अद्यापपर्यंत एकूण रुग्णांची संख्या २ हजार १९७ झाली आहे.

*********

कोरोनाच्या प्रादुर्भावामुळं शाळा अजूनही बंद असल्या तरी, शालेय विद्यार्थ्यांचं आरोग्य आणि त्यांना आवश्यक असलेल्या पोषक आहाराची गरज लक्षात घेऊन, त्यांना माध्यान्ह आहार योजनेसाठी मिळणारा भत्ता द्यावा अशी सुचना, केंद्र सरकारनं सर्व संबंधित यंत्रणांना केली आहे.

*********

श्रम आणि रोजगार मंत्रालय, भारत सरकारच्या अखत्यारितील रोजगार आणि प्रशिक्षण महासंचालनालयाच्या नागपूर येथील कार्यालयाने, राष्ट्रीय आजीविका सेवा केंद्राद्वारे अनुसूचित जाती आणि अनुसूचित जमातीमधील बेरोजगार युवक / युवतींना प्रशिक्षण आणि मार्गदर्शन देण्याकरिता संस्थाकडून प्रस्ताव मागविले आहेत.

*********

रामटेकच्या कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाच्या विस्तार सेवा मंडळातर्फे, दरवर्षी श्रावण पौर्णिमेला संस्कृत दिन साजरा केला जातो. या निमित्तानं, संस्कृत महोत्सव-२०२० चं, तीन ऑगस्ट रोजी ऑनलाइन माध्यमातून, महाराष्ट्र स्तरावर आयोजन, भारताचं हृदयस्थान असलेल्या नागपुरात करण्यात आलं आहे. याद्वारे संस्कृत भाषेचा प्रचार-प्रसार व्यापक आणि प्रभावी रितीनं सार्वत्रिकरण केल्या जात. या महोत्सवाचं उद्घाटन महाराष्ट्राचे राज्यपाल आणि विश्वविद्यालयाचे कुलपती, भगत सिंग कोश्यारी यांच्या हस्ते होणार असून, केंद्रीय मनुष्यबळ विकास मंत्री रमेश पोखरीयाल आणि महाराष्ट्राचे उच्च आणि तंत्र शिक्षण मंत्री उदय सामंत प्रमुख अतिथी म्हणून उपस्थित राहणार आहेत. सारस्वत अतिथी म्हणून, राष्ट्रीय संस्कृत संस्थानचे पूर्व कुलगुरू, प्रो. व्ही. कुटुंबशास्त्री, विश्वविद्यालयाचे कुलगुरू प्रो. श्रीनिवास वरखेडी, कुलसचिव प्रो. विजयकुमार, विशेषत्वानं उपस्थित राहतील. कोविड-१९ च्या पार्श्वभूमीवर, प्रथमच हा महोत्सव आभासी पद्धतीनं अर्थात ऑनलाईन माध्यमातून साजरा होणार आहे. सदर महोत्सवाच्या उद्घाटन समारोहात २०० हून अधिक संस्था आणि दहा हजारांहून अधिक संस्कृतप्रेमी उपस्थित राहणार आहेत. हा संस्कृतोत्सव, महिनाभर चालू राहणार असून, महाराष्ट्रातील विविध संस्था, महाविद्यालये, संस्कृताधारित स्पर्धा आणि कार्यक्रमांचं आयोजन यात राहणार आहे.

*********